मागासवर्गीय मुलामुलींना स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांच्या मुलामुलींना मॉड्युलर स्टोरेज कॅबिनेटचा पुरवठा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१४/प्र.क्र.१४९/शिक्षण-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक : बीसीएच -२०१४/ प्र.क्र.८१/शिक्षण-२, दि.२७ ऑगस्ट २०१४.

२) शासन शुध्दिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक : बीसीएच -२०१४/ प्र.क्र.१४९/शिक्षण-२, दि.१२ सप्टेबर २०१४.

३) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र जा.क्र. सकआ/ शावगृ/ अनुदानित वसतिगृह/ मॉड्युलर स्टोरेज/ मुदतवाढ/ खर्चास मंजुरी/ प्र.क्र.२५-२०१४/ सन २०१५-१६/ का-५अ/ १३४१, दि.१९/०६/२०१५

४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्रमांक : बीसीएच -२०१४/ प्र.क्र.१४९/शिक्षण-२, दि.०१ ऑगस्ट २०१५

**शासन निर्णय-**

सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत अनुदानित वसतिगृहांच्या सोयीसुविधेअंतर्गत ट्रंक पेटी ऐवजी मॉड्युलर स्टोरेज कॅबिनेट या साहित्याचा मे.वैद्य इंडस्ट्रीज, नागपूर यांचेमार्फत पुरवठा करण्याकरिता शासन निर्णय दि.२७ ऑगस्ट, २०१४ अन्वये मंजुरी देण्यात आलेली आहे. तसेच, शासन शुध्दिपत्रक दि.१२ सप्टेबर २०१४ अन्वये वाहतूक खर्चासही मान्यता दिलेली आहे. सदर संस्थेस पुरवठा आदेश मिळाल्यानंतर सन २०१४-१५ मध्ये संपूर्ण पुरवठा करण्यास पुरेसा कालावधी मिळाला नसल्याने दिनांक ०१.०८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०४.२०१५ ते २०.०८.२०१५ या कालावधीमध्ये चालू वर्षी साहित्यांचा पुरवठा करण्यास या मान्यता दिली असल्याने सदर संस्थे मार्फत पुरवठा करण्यात येणाऱ्या साहित्यांचा खर्च रु.२०,२१,५७,९४४/-( रुपये वीस कोटी एकवीस लाख सत्तावण हजार नऊशे चव्वेचाळीस ) व अधिक वाहतुक खर्च सन २०१५-१६ या वर्षाच्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

यावर होणारा खर्च "मागणी क्र.एन-३, लेखाशिर्ष २२२५ अनुसूचित जाती जमाती प इतर मागासवर्गीयांचे कल्याण ०३ मागासवर्गीयांचे कल्याण ८० सर्वसाधारण ८०० इतर खर्च (०१)(०६) मागासवर्गीय शैक्षणिक संस्थांवरील सोयीसुविधा वाढविणे, ३१ सहायक अनुदाने, वेतनेतर मागणी (२२२५ ३३३१)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१२१६४४२९४८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uttam Shivram Lonare

Digitally signed by Uttam Shivram Lonare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivram Lonare
Date: 2015.08.17 16:59:28 +05'30'

( उ.शि.लोणारे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, यांचे खासगी सचिव
२) मा.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
६) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
७) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ ( लेखा परिक्षा) / (लेखा अनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०) मे.वैद्य इंडस्ट्रीज, ५११, विनायक टॉवर, उंटखाना रोड, नागपूर-४४०००९
११) निवड नस्ती.